राज्य मानवी हक्क आयोगाच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील एकूण १५ काल्पनिक पदे निर्माण करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एसएचआरसी-०६१७/प्र.क्र.१५६/पोल-१४

२ रा मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १० ऑगस्ट, २०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक पदनि २०१३/प्र.क्र.११/१३/वि.सु.१, दिनांक ०२.०२.२०१३
२) प्रधान सचिव, राज्य मानवी हक्क आयोग यांचे पत्र क्रमांक एसएचआरसी/६/२०१६/७८७, दिनांक २६ जूलै २०१६
३) अवर सचिव, राज्य मानवी हक्क आयोग यांचे पत्र क्रमांक एसएचआरसी/९/२०१६/९४९, दिनांक १६ सप्टेंबर,२०१६

**प्रस्तावना -**

राज्य मानवी हक्क आयोगाचे कामकाज सुरळित व प्रभावीपणे पार पाडण्यासाठी आयोगाच्या शासनाकडील प्रलंबित प्रस्तावांचा उल्लेख करण्यांत आला आहे. सदर प्रस्तावांमध्ये आयोगाकडील कामकाजाचा निपटारा करण्यासाठी आयोगाच्या आस्थापनेवर नव्याने ३९ पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव आयोगाने शासनास सादर केला आहे. आयोगाच्या शासन स्तरावरील विविध प्रलंबित प्रस्तावावर निर्णय घेण्याबाबत जनहित याचिका क्रमांक ११५/२०१३ मध्ये मा. न्यायालयाने आदेश पारित केले आहेत.

शासनामार्फत राज्यातील शेतकऱ्यांसाठी जाहीर केलेली कर्जमाफी योजना, स्थानिक व्यापार कर रद्द होऊन राज्यात लागु केलेल्या वस्तु व सेवा कर प्रणालीमुळे स्थानिक स्वराज्य संस्थाना शासनामार्फत दयावी लागणारी नुकसान भरपाईची रक्कम इत्यादी बाबींमुळे शासकीय खर्चावर नियंत्रण ठेवण्याची आवश्यकता आणि कायमस्वरुपी पदनिर्मिती करण्याऐवजी करार पध्दतीने किंवा बाहय यंत्रणेमार्फत कामे करुन घेण्याबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण इत्यादी बाबी लक्षात घेता

आयोगाकडील प्रलंबित कामकाजाचा निपटारा विहित कालावधीत करण्यासाठी काल्पनिक पदे ठराविक कालावधीसाठी बाहय स्त्रोतातून घेऊन करण्याबाबत आयोगाने अनौपचारीक दिलेली सहमती विचारात घेता राज्य मानवी हक्क आयोगाच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील एकूण १५ काल्पनिक पदे ठराविक कालावधीसाठी निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने राज्य मानवी हक्क आयोगाच्या आस्थापनेवर खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार काल्पनिक पदे दोन वर्षे कालावधीसाठी निर्माण करण्यास व ती बाहययंत्रणेद्वारे भरण्यास याद्वारे मान्यता देण्यांत येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १. | विधी सहायक | ०५ |
| २. | लघुलेखक | ०३ |
| ३. | लघुटंकलेखक | ०३ |
| ४. | लिपिक-टंकलेखक | ०४ |

उपरोक्त पदे ही नियमित पदे नसुन काल्पनिक पदे (Notional) आहेत. सदर पदे बाहययंत्रणेद्वारा भरतांना वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक पदनि २०१३/प्र.क्र.११/१३/वि.सु.१, दिनांक ०२.०२.२०१३ व यासंदर्भात वित्त विभागाने निर्गमित केलेल्या सूचनाप्रमाणे कार्यवाही करण्यांत यावी.

०२ उपरोक्त काल्पनिक पदांकरिता येणारा खर्च गृहविभाग, मागणी क्रमांक बी-४,२०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा (००)(०५) राज्य मानवी हक्क आयोग (अनिवार्य)(२०५२ ०५१७) (३१) सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर व उपलब्ध अनुदानातून भागविण्यांत यावा. बाहययंत्रणेद्वारे काम करुन घेण्याच्या कामाचे प्रदान 'वेतन' या तपशीलवार शीर्षाखाली न दर्शविता

'कार्यालयीन खर्च' या तपशीलवार शीर्षाखाली दाखविणे आवश्यक आहे. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४०४/ आपुक, दिनांक ०४.०८.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१०१५४५४८७२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Uday B Kannav
Date: 2017.08.10 15:35:37 +05'30'

**( उ. बा. काण्णव )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, हजारीमल सोमाणी मार्ग, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस समोर, मुंबई ३२.
२. लेखाअधिकारी, महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, हजारीमल सोमाणी मार्ग, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस समोर, मुंबई ३२
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. महालेखापाल (१/२) लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
६. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई